**"एन. डी. स्टुडिओ" मौजे हातनोली ता. खालापूर जि. रायगड शासनास हस्तांतरण करण्यासाठी वितरित करावयाच्या अंतिम टप्प्यातील निधीस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२३/प्र.क्र.९४ (भाग-१)/सां.का.१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०५ मार्च, २०२५

**वाचा :**

१) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/ प्र.क्र.९४/ सां.का.१, दि.०२ नोव्हेंबर, २०२३.
२) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. ०८ नोव्हेंबर, २०२३ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
३) मा. अपर मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. ०३ जानेवारी, २०२४ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
४) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. १५ मार्च, २०२४ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
५) राष्ट्रीय कंपनी विधी प्राधिकरण यांचे दि. १४ नोव्हेंबर, २०२४ रोजीचे आदेश.
६) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/ प्र.क्र.९४ (भाग-१)/ सां.का.१, दि.१० डिसेंबर, २०२४.
७) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/ प्र.क्र.९४ (भाग-१)/ सां.का.१, दि.२२ जानेवारी, २०२४.
८) महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित यांचे दि. ३०.०१.२०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :**

दिवंगत श्री.नितीन देसाई यांचा कर्जत येथील एन.डी. स्टुडिओच्या निर्मितीसाठी "एडलवाईज" या कंपनीकडून घेतलेल्या कर्जाची रक्कम थकीत अदा करण्याच्या अनुषंगाने, नॅशनल कंपनी लॉ ट्रिब्युनल, मुंबई (NCLT) यांच्या खंडपीठासमोर एन.डी. स्टुडिओ यांच्याकडून अर्ज दाखल करण्यात आला होता. सदर खंडपीठाने दिलेल्या आदेशास अनुसरुन नादारी व दिवाळखोरी संहिता, २०१६ नुसार कॉरपोरेट इनसॉल्व्हन्सी रिझोल्युशन प्रोसेस सुरु करण्यात आली होती. त्या प्रक्रियेमध्ये शासनाने "अभिव्यक्ती स्वारस्य" सहभाग नोंदविला होता. सदर सहभागासाठी मा. मुख्यमंत्री महोदयांनी मान्यता दिलेली होती.

त्यानुषंगाने, उपनिर्दिष्ट क्र.१ अन्वये, दिवंगत श्री.नितीन देसाई यांचा कर्जत येथील एन.डी.स्टुडिओ ताब्यात घेण्यासाठी मालमत्तेचे मुल्यांकन करण्यासाठी समिती गठीत करण्यात आली होती. तद्नंतर महामंडळाने सादर केलेल्या प्रस्तावानुसार, संदर्भ क्र.५ अन्वये, राष्ट्रीय कंपनी विधी प्राधिकरण न्यायालयाच्या निकालानुसार सदर मालमत्ता शासनास हस्तांतर करण्यास्तव नॅशनल कंपनी लॉ ट्रिब्युनल, मुंबई (NCLT) यांना रुपये १२०.०० कोटी इतका निधी वितरित करणे आवश्यक आहे. त्यानुसार, उपनिर्दिष्ट क्र.६ अन्वये, पहिल्या टप्प्यातील हफ्ता रुपये ५०.०० कोटी व संदर्भ क्र. ७ अन्वये दुसऱ्या टप्प्यातील हफ्ता

रुपये ३५.०० कोटी असे एकूण रुपये ८५.०० कोटी अदा करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली आहे.

आता, संदर्भ क्र.८ अन्वये, महामंडळाकडून तिसरा व अंतिम टप्प्यातील निधी अदा करण्याबाबत विनंती करण्यात आली आहे. तरी, सदर विनंतीच्या अनुषंगाने तिसऱ्या टप्प्यातील निधी वितरण करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

मौजे हातनोली ता. खालापुर येथील "एन.डी. स्टुडिओ" शासनास हस्तांतर प्रयोजनार्थ तिसऱ्या व अंतिम टप्प्यातील हफ्ता रक्कम रुपये ३५.०० कोटी ( रुपये पस्तीस कोटी फक्त ) इतका निधी महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई यांच्यामार्फत राष्ट्रीय कंपनी विधी प्राधिकरण यांना भरणा करण्यात आला आहे. सदर निधीची प्रतिपूर्ती दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई या महामंडळास अदा करण्यास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर रक्कम वितरित करताना प्रशासकीय बाबींची पूर्तता करण्याची जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई यांची राहिल.

०३. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र.झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती कार्यक्रम (००) १०२, कला संस्कृती प्रचालन (०३) (०७) मराठी चित्रपट निर्मितीसाठी सहायक अनुदान (२२०५ १५९९) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या अर्थसंकल्पीय वर्षात प्राप्त झालेल्या निधीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान सशर्त आहे.

०४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१४१/२०२५/का-१४४३, दि.१३.०२.२०२५ आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.११९/२०२५/व्यय-१५, दि.१७.०२.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४ अन्वये विहित अटी व शर्ती पूर्ततेच्या अधिन मान्यता देण्यात येत आहे.

०५. या प्रयोजनार्थ वितरित निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र या विभागास सादर करणे बंधनकारक राहिल. यासाठी, उप सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून अवर सचिव (रोखशाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०३०५१६३००२७३२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2025.03.05 16:33:23 +05'30'

**( अनिरुध्द सू. देशपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. नियोजन विभाग (का.१४४३), मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग (व्यय-१५, अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई- यांना विनंती करण्यात येते की, उक्त अनुदानाची रक्कम BDS द्वारे उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील कार्यवाही करण्यात यावी.
११. अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई- यांना विनंती करण्यात येते की,सदर शासन निर्णयातील नमूद रक्कम व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई यांच्या नावे वितरित करण्यात यावी.
१२. निवडनस्ती (सां.का.१).